राज्य सेवा परिक्षा-२०१९ च्या आधारे शिफारस प्राप्त ठरलेल्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी)-७ मधील गट विकास अधिकारी, गट-अ यांना नियमित पदस्थापना देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मविसे-११२४/प्र.क्र.३३/आस्था-३ अ**
३ रा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: ११ मार्च, २०२४

**वाचा :**

१) **शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/ कार्या.१२, दिनांक १४ जुलै, २०२१.

२) **शासन पत्र, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः** टिआरएन-२०२४/प्र.क्र.१४/प्रशि-२, दिनांक ०५ मार्च, २०२४.

३) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मविसे-१०२३/प्र.क्र.१७०/२०२३/आस्था-३, दिनांक २१ ऑगस्ट, २०२३.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने राज्य सेवा मुख्य परीक्षा-२०१९ च्या अंतिम निकालाच्या आधारे केलेल्या शिफारशीनुसार व यशदा, पुणे या प्रशिक्षण संस्थेमध्ये दाखल झालेल्या महाराष्ट्र विकास सेवा मधील गट विकास अधिकारी, गट-अ या पदावरील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांची सेवा जेष्ठता, एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी)-७ अंतर्गत उक्त वाचा मधील अनुक्रमांक २ येथील दिनांक ०५ मार्च, २०२४ रोजीच्या पत्रान्वये, सामान्य प्रशासन विभागाने निश्चित केली आहे. त्यानुसार संबंधित परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना नियमित पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार, पदस्थापना करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने, खालील अधिकाऱ्यांच्या नियमित पदस्थापनेचे आदेश उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक १४

जुलै, २०२१ रोजीच्या शासन अधिसूचनेतील तरतूदीनुसार, महसूल विभाग वाटप करून त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर पुढीलप्रमाणे नियमित पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | अनुज्ञेय महसूली विभाग | नियमित नियुक्ती दिलेले पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.कदम योगेश विलास | पुणे | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, मंगळवेढा, जिल्हा सोलापूर | रिक्त पदी |
| २ | श्री.कदम राजेश विलास | नाशिक | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, देवळा, जिल्हा नाशिक | रिक्त पदी |
| ३ | श्री.मंडलिक गणेश कोंडीराम | कोकण-१ | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, दापोली, जिल्हा रत्नागिरी | रिक्त पदी |
| ४ | श्री.मुंडे अमितकुमार ज्ञानेश्वर | छत्रपती संभाजीनगर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सेलु, जिल्हा परभणी | रिक्त पदी |
| ५ | श्री.शेंडगे प्रदिप रामदास | पुणे | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, माण (दहिवडी), जिल्हा सातारा | रिक्त पदी |
| ६ | श्री.सावंत अजिंक्य दत्तात्रय | कोकण-१ | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, दोडामार्ग, जिल्हा सिंधुदूर्ग | रिक्त पदी |
| ७ | श्री.पायघन माधव बाबुराव | अमरावती | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, संग्रामपूर, जिल्हा बुलढाणा | रिक्त पदी |
| ८ | श्री.सुर्यवंशी अजिंक्य शहाजी | छत्रपती संभाजीनगर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सोनपेठ, जि.परभणी | रिक्त पदी |
| ९ | श्री.कासोदे अभिषेक दिपक | अमरावती | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, तिवसा, जिल्हा अमरावती | रिक्त पदी |
| १० | श्री.गुंड विवेक मारूतराव | नाशिक | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, बोदवड, जिल्हा जळगाव | रिक्त पदी |
| ११ | श्री.वाकचौरे सुहास मारूतीराव | छत्रपती संभाजीनगर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, गंगापूर, जिल्हा छत्रपती संभाजीनगर | रिक्त पदी |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | अनुज्ञेय महसूली विभाग | नियमित नियुक्ती दिलेले पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १२ | श्रीम. शिंदे सुस्मिता शहाजीराव | नागपूर | सहायक आयुक्त (रोहयो), नागपूर | प्रतिनियुक्तीने |
| १३ | श्रीम.राणे पूनम भगवान | अमरावती | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, आर्णी, जिल्हा यवतमाळ | रिक्त पदी |
| १४ | श्री.पाखरे अभिजित गहिनीनाथ | नागपूर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, अहेरी, जिल्हा गडचिरोली | रिक्त पदी |
| १५ | श्रीम.लाड स्नेहल संजय | नागपूर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, नागभिड, जिल्हा चंद्रपूर | रिक्त पदी |
| १६ | श्रीम.मुळीक ज्योत्स्ना प्रकाश | छत्रपती संभाजीनगर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, माजलगांव, जिल्हा बीड | रिक्त पदी |
| १७ | श्री.जाधव पुंडलिक विश्वनाथ | नागपूर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, आमगाव, जिल्हा गोंदिया | रिक्त पदी |
| १८ | श्री.तोटेवाड प्रफुल्ल प्रकाशराव | छत्रपती संभाजीनगर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, धर्माबाद, जिल्हा नांदेड | रिक्त पदी |

**०२.** संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी संबंधित परिविक्षाधीन अधिकाऱ्यांनी त्यांच्या नियमित पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करावे. संबंधित अधिकारी यांनी नवीन नियमित नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. विहीत कालावधीत (पदग्रहण अवधी वगळता) पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होण्यास टाळाटाळ केल्यास अथवा रजेवर गेल्यास अथवा नियुक्तीत बदल करुन घेण्यासाठी अशासकीय व्यक्तींमार्फत शासनावर दबाव आणल्यास त्यांच्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल, याची नोंद घ्यावी. तसेच जिल्हा संलग्नतेच्या टप्प्यावर अपूर्ण राहिलेल्या प्रशिक्षणाचे उर्वरित प्रशिक्षण हे उमेदवार चक्राकार पध्दतीने वाटप करण्यात आलेल्या महसुल विभागातील ज्या जिल्ह्यात रूजू होतील, त्या जिल्ह्यामध्ये पुर्ण करुन घेण्यात यावे.

**०३.** उक्त वाचा मधील अनुक्रमांक ३ येथील दिनांक २१ ऑगस्ट, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये ग्राम विकास विभागांतर्गत महाराष्ट्र विकास सेवामधील, गट विकास अधिकारी, गट-अ

या संवर्गाकरिता निश्चित केलेल्या संख्याबळानुसार नियोजन विभागांतर्गत सहायक आयुक्त (रोहयो), नागपूर या पदावर उपरोक्त तक्त्यातील अनुक्रमांक १२ येथील श्रीम. शिंदे सुस्मिता शहाजीराव यांना प्रतिनियुक्ती पदस्थापना देण्यात येत आहे.

**०४.** संबंधित अधिकारी हे विहित कालावधीत नियुक्तीच्या पदावर रूजू न झाल्यास संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कारवाईचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

**०५.** संबंधित अधिकाऱ्यांचे माहे मार्च, २०२४ पासूनचे वेतन नियमित नियुक्ती दिलेल्या जिल्हा परिषदा/पंचायत समित्या /संबंधित नियुक्ती कार्यालयाने अदा करावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१११६५५१८४२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DR.URMILA VAIBHAV JOSHI

Digitally signed by DR.URMILA VAIBHAV JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=0a6ce46aedb9acea34c72711d852d8e2e71e76603f9082ea9709649c6f45dc30, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=713D6BDDB988B05B1CC072EBFD3A58E7E640EA20499573AAE08DC106AC632ADD, cn=DR.URMILA VAIBHAV JOSHI
Date: 2024.03.11 18:23:34 +05'30'

**(डॉ. उर्मिला जोशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (ग्रा.वि.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, सर्व विभाग.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
६. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
७. संचालक, वनामती, धरमपेठ अमरावती रोड, नागपूर.
८. अवर सचिव (आस्था-२ व आस्था-३), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व जिल्हे.
१०. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व.
११. संबंधित अधिकारी (संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचेमार्फत).
१२. निवड नस्ती (कार्यासन आस्था-३ अ), ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.